श्री

अथ व्यंकटेशस्तोत्र प्रारंभः

A. Gururaj Rajaska

९१२

श्रीगणेशायनमः ॥ श्रीसरस्वत्यैनमः ॥ श्रीगुरुभ्योनमः
श्रीव्यंकटेशायनमः ॥ ॥ अथव्यंकटेशस्तोत्रप्रारंभः ॥
ॐनमोजीहेरंबा ॥ सकळादितूंप्रारंभा ॥ आठऊनितुझी
स्वरूपशोभा ॥ वंदनभावेंकारितसें ॥ १ ॥ नमनमाझेंहंस
वाहिनी ॥ वाग्वरदेविलासिनी ॥ ग्रंथवदावयानिरूपणीं
भावार्थखाणीजयामाजी ॥ २ ॥ नमनमाझेंगुरुवर्या ॥
प्रकाशरूपातूंस्वामिया ॥ स्फूर्तीद्यावीग्रंथवदावया ॥ जे
णेंश्रोतयांसुखहोय ॥ ३ ॥ नमनमाझेंसंतसज्जना ॥ आ
णियोगियांमुनिजना ॥ सकळश्रोतयांसाधूजना ॥ नम

१ गणपती. २ सरस्वती. ३ ऐकणारांस.

नमाझेंसाष्टांगीं ॥ ४ ॥ ग्रंथऐकाप्रार्थनाशतक ॥ महादो
षाशीदाहक ॥ संतोषोनिवैकुंठनायक ॥ मनोरथपूर्णकरी

ल ॥ ५ ॥ जयजयाजीव्यंकटरमणा ॥ दयासागरापरिपू
र्णा ॥ परंज्योतिप्रकाशगहना ॥ करितोंप्रार्थनाश्रवणकी
जे ॥ ६ ॥ जननीपरीलांपाळिलें ॥ पितयापरीलांसांभा
ळिलें ॥ सकळसंकटांपासूनरक्षिलें ॥ पूर्णदीधलेंप्रेमसुख
॥ ७ ॥ हेंअलौलिकजरीमानावें ॥ तरीजगहेंस्त्रजिलेंआघ
वें ॥ जनकजननीपणस्वभावें ॥ सहजआलेंअंगासीं ॥ ८ ॥ ॥ १ ॥
दीनानाथाब्रिदासाठीं ॥ भक्तरक्षिलेसंकटीं ॥ प्रेमदिधलें

---

१ विष्णु. २ ऐक. ३ आई. ४ आश्चर्य, चमत्कार. ५ शृंगारिलें.

अपूर्वगोष्टी ॥ भजनासाठींभक्ताच्या ॥९॥ आतांपरिसा
वीविज्ञापना ॥ कृपाळुवालक्ष्मीरमणा ॥ मजघालूनिगर्भा
धाना ॥ अलौलिकरचनादाखविली ॥ १० ॥ तुजनजाण
तांझालोंकष्टी ॥ आतांहेतुझेपायींघातलीमिठी ॥ कृपाळु
वाजगजेठी ॥ अपराधपोटींघालींमाझे ॥ ११ ॥ माझिया
अपराधांच्याराशी ॥ भेदोनिगेल्यागग[1]नाशी ॥ दयावंताहृ
षीके[2]शी ॥ आपल्याब्रि[3]दासीसाच[4]करीं ॥ १२ ॥ पुत्राचेसह
स्त्रअपराध ॥ माताकायमानीतयांचाखेद ॥ तेवींतूंकृपा
ळुगोविंद ॥ मायबापमजलागीं ॥ १३ ॥ उडदामाजीका

---

१ आकाशीं. २ विष्णु. ३ प्रतिज्ञा. ४ खरी.

ळेंगोरें ॥ कायानिवडावेंनिवडनारें ॥ कुचंलियाचींवृक्षफ
ळें ॥ मधुरकोठोनिअसतील ॥ १४ ॥ अरांटीलागींमृदता
कोठूनिअसेलकृपावंता ॥ पाषाणासींगुल्मलता ॥ कैशा
यापरीफुटतील ॥१५॥ आपादमस्तकावरीअन्यायी ॥ प
रीतुझेपदरींपडिलोंपाहीं ॥ आतांरक्षणेंनानाउपायीं ॥ क
रणेंतुजउचित ॥ १६ ॥ समर्थाचेघरींचेंश्वान ॥ त्यासर्व
हिदेतिमान ॥ तैसातुझाआणवितोंदीन ॥ हाअपमानकव
णाचा ॥ १७॥ लक्ष्मीतुझेपायातळीं ॥ आह्मीभिक्षेसिघा
लोनिझोळी ॥ येणेंतुझ्याब्रीदावळी ॥ कैशीराहीलगोविंदा



१ काजरीचीं. २ कांटेगोखरू. ३ वेल. ४ पायांपासून मस्तकापर्यंत. ५ कुत्रा.

॥१८॥ कुबेरतुझाभांडारी ॥ आज्ञाफिरविशीदारोदारीं ॥ यांतपुरुषार्थमुरारी ॥ कायतुजलापैंआला ॥ १९ ॥ द्रौपदी सींवस्त्रेंअनंता ॥ देतहोतासीभाग्यवंता ॥ आज्ञालागीक्र पणता ॥ कोठानिआणिलीगोविंदा ॥ २० ॥ मावेचीकरो निद्रौपदीसती ॥ अवेंपुरविलींमध्यरात्रीं ॥ ऋषेश्वरांच्या बैसवोनिपंक्ती ॥ तृप्तकेल्याक्षणमात्रें ॥ २१ ॥ अनंतासा ठींदाहींदिशा ॥ आज्ञाफिरविशीजगदीशा ॥ कृपाळुवाप रमपुरुषा ॥ करुणाकैशीतुजनये ॥ २२ ॥ अंगिकारिया शिरोमणी ॥ तुजप्रार्थितोंमधुरवचनीं ॥ अंगीकारकेलि

---

१ दुर्वास ऋषी व त्याचे साठ हजार शिष्य.

याझंणी ॥ मजहातीचेंनसोडावें॥ २३ ॥ समुद्रें अंगिकारि
लावडवानळ ॥ तेणें अंतरींहोतसेविव्हळ ॥ ऐसेंअसोनि
॥ ३ ॥ सर्वकाळ ॥ अंतरींसांठविलातयानें ॥ २४॥ कूर्मेंपृथ्वीचा
घेतलाभार ॥ तेणेंसांडिलानाहींबडिवार ॥ एवढाब्रह्मांड
गोळथोर ॥ त्याचाअंगीकारपैंकेला ॥ २५ ॥ शंकरेंधरिलें
हळहेळ ॥ तेणेंनीळवर्णझालागळा ॥ परीत्यागिलेंनाहीं
गोपाळा ॥ भक्तवत्सलागोविंदा ॥ २६ ॥ माझियाअपरा
धांच्यापरी ॥ वर्णितांशिणलीवैखरी ॥ दुष्टपतीतदुराचा ॥ ३ ॥
री ॥ अधमाहुनिअधम ॥ २७॥ विषयासक्तमंदमतीआ

१ लवकर. सत्वर. २ हृदयांत. ३ विष. ४ जीभ.

ळसी ॥ कृपणकुव्यसनीमळीणमानसीं ॥ सदासर्वकाळ सज्जनासी ॥ द्रोहकरीसर्वदां ॥ २८ ॥ वचनोक्तीनाहींम धुर ॥ अत्यंतजनासिनिष्ठुर ॥ सकळपामरांमाजीपामर ॥ व्यर्थबाडिवारजगींवाचे ॥ २९ ॥ कामक्रोधमदमत्सर ॥ हें शरीरत्याचेंबिढार ॥ कामकल्पनेसीथार ॥ हृदयेथेंकेलाअ से ॥ ३० ॥ अठराभारवनरूपतींचीलेखणी ॥ समुद्रभरिला मषीकरूनी ॥ माझेअवगुणलिहितांधरणी ॥ लिहितांनजा तीगोविंदा ॥ ३१ ॥ ऐसापतीतमीखरा ॥ परीतूंपतीतपाव नशाङ्र्गधरा ॥ तुवांअंगीकारकेलियागदाधरा ॥ कोणगुण

---

१ निर्दय. २ पृथ्वी, भूमि. ३ पापी.

दोषमणील ॥ ३२ ॥ नीचरतलीरायासीं ॥ तिसीकोणह्मणे
लदासी ॥ लोहें[1]लागलियापरिसासीं ॥ पूर्वस्थितिमगकैंची
॥ ३३ ॥ गांवींचेहोतेलेंडवोहळ[2] ॥ गंगेसींमिळतांगंगाजळ
काग[3]विष्ठेचेझालेपिंपळ ॥ तयांसीनिंचकोणह्मणे ॥ ३४ ॥
तैसाकुजातीमीअमंगळ ॥ परीतुह्माह्मणवितोंकेवळ ॥ क
न्यादेऊनियांकुळ ॥ मगकायाविचारावें ॥ ३५ ॥ जाणतअ
सतांअपराधीनर ॥ तरीकांकेलाअंगीकार ॥ अंगीकाराव
रीअव्हेर ॥ समर्थेंकेलानपाहिजे ॥ ३६ ॥ धांवपावरेगोविं
दा ॥ हातींघेऊनियांगदा ॥ करीमाझेकर्माचाचेंदा ॥ सच्चि

१ लोखंड. २ परे, गटेरें, मोऱ्या. ३ कावळा.

दानंदाश्रीहरी ॥ ३७ ॥ तुझियानामाचीअपरमितशक्ती
तेथेंमाझींपापेंकिती ॥ कृपाळुवालक्ष्मीपती ॥ बरवेंचित्तीं
बिचारी ॥ ३८ ॥ तुझेंनामपातितपावन ॥ तुझेंनामकालि
मलदहन ॥ तुझेंनामभवतारण ॥ संकटनाशननामतुझें॥
॥ ३९ ॥ आतांप्रार्थनांऐकाकमळापती ॥ तुझेनामींराहो
माझीमती ॥ हेंचिमागणेंपुढतापुढती ॥ परंज्योतीव्यंकटे
शा ॥ ४० ॥ तूंअनंततुझींअनंतनामें ॥ तयांमाजीअतिसु
गमें ॥ तेमीअल्पमतीसप्रेमें ॥ स्मरोनिप्रार्थनाकरीतसें॥
॥ ४१ ॥ श्रीव्यंकटेशावासुदेवा ॥ प्रद्युम्नाअनंताकेशवा ॥

१ संसारापासून मुक्त करणारें. २ लक्ष्मीपती विष्णु ३ मोठी

 संकर्षणाश्रीधरामाधवा ॥ नारायणाआदिमूर्ती ॥ ४२ ॥ 
पद्मनाभादामोदरा ॥ प्रकाशगहनापरात्परा ॥ आदिअ
 नादिविश्वंभरा ॥ जगदोद्धाराजगदीशा ॥ ४३ ॥ कृष्णावि
ष्णोहृषीकेशा ॥ अनिरुद्धापुरुषोत्तमपरेशा ॥ नृसिंहवाम
नभार्गवेशा ॥ बौद्धकलंकीनिजमूर्ती ॥ ४४ ॥ अनाथरक्ष
काआदिपुरुषा ॥ पूर्णब्रह्मसनातननिर्दोषा ॥ सकळमंग
ळमंगळाधीशा ॥ सज्जनजीवनासुखमूर्ती ॥ ४५ ॥ गुणा
तीतागुणज्ञा ॥ निजबोधरूपनिमग्ना ॥ शुद्धसात्विकसूज्ञा 
गुणग्राह्यापरमेश्वरा ॥४६॥ श्रीनिधिश्रीवत्सलांछनधरा

१ परशुराम. २ पाळण करणारा.

भयकृद्भयनाशनागिरिधरा ॥ दुष्टदैत्यसंहारकरा ॥ वीरासु
खकरातूंएक ॥४७॥ निखिलनिरंजनानिर्विकारा ॥ विवे
कखाणीवैरागरा ॥ मधुमुरुदैत्यसंहारकरा ॥ असुरदमना
उग्रमूर्ती ॥ ४८ ॥ शंखचक्रगदाधरा ॥ गरुडवाहनाभक्त
प्रियकरा ॥ गोपीमनरंजनासुखकरा ॥ अखंडितस्वभावें
॥ ४९ ॥ नानानाटकसूत्रधारिया ॥ जगद्व्यापकाजगमान्या
॥ कृपासमुद्राकरुणालया ॥ मुनिजनध्येयामूळमूर्ती ॥
॥ ५० ॥ शेषशयनासार्वभौमा ॥ वैकुंठवासीयानिरुप
मा ॥ भक्तकैवारीयागुणधामा ॥ पावआह्मायेसमर्था ॥

१ श्रीकृष्णा. २ आकाररहित. ३ घर, ठिकाण.

॥५१॥ ऐसीप्रार्थनाकरोनिदेविदास ॥ अंतरींआठविला श्रीव्यंकटेश ॥ स्मरतांहृदयींप्रगटलाईश ॥ त्यासुखास पारनाहीं ॥ ५२ ॥ हृदयींआविर्भवलीमूर्ती ॥ त्यास्वरूपा चिअलोलीकस्थिती ॥ आपुलेंआपणश्रीपती ॥ वाचेहा तींबोलवितसे ॥ ५३ ॥ तेंस्वरूपअत्यंतसुंदर ॥ श्रोतींश्रव णकीजेसादर ॥ सांवळीतनूसुकुमार ॥ कुंकुमाकारपाद पद्में ॥ ५४ ॥ सुरेखसरळअंगोळिका ॥ नखेंजैसीचंद्ररे खा ॥ घोटींवसुनीळअपूर्वदेखा ॥ इंद्रनीळाचियेपरी ॥ ॥ ५५ ॥ चरणींवाळेघागरिया ॥ वाकीवरत्याागुजरिया ॥



१ ध्यानांत आणिली. २ लक्ष्मीपती विष्णु.

सरळसुंदरपोटरीया ॥ कर्दळीस्तंभाचियेपरी ॥५६॥ गुड
घेमांडियाजानुस्थळ ॥ कटितटींकिंकिणीविशाळ ॥ खा
लतेंविश्वउत्पत्तीस्थळ ॥ वरीझालाळीसोनसळा ॥ ५७ ॥
कटावरुतेंनाभिस्थान ॥ जेथूनिब्रह्माझालाउत्पन्न ॥ उद
रींत्रिवळीशोभेगहन ॥ त्रैलोक्यसंपूर्णजयामाजी ॥ ५८ ॥
वक्षस्थळींशोभेपदक ॥ पाहोनिचंद्रमाअधोमुख ॥ वैज
यंतीकरीलखलख ॥ विद्युल्लतेचियेपरी ॥ ५९ ॥ हृदयीं
श्रीवत्सलांच्छन ॥ भूषणमिरवीश्रीभगवान ॥ तयावरूतें
कंठस्थान ॥ जयासिमुनिजनअवलोकिती ॥ ६० ॥ उभ

१ केळी. २ मांड्या. ३ ऊर. ४ विजेसारखी.

 यबाहूदंडसरळ ॥ नखेंचंद्रापरीसतेजाळ ॥ शोभतीदोन्ही 
करकमळ ॥ रातोत्पळाचियेपरी ॥ ६१ ॥ मणगटींविरा
 जतीकंकणें ॥ बाहुवटींबाहुभूषणें ॥ कंठींलेइलींआभरणें
सूर्यकिरणेंउगवलीं ॥ ६२ ॥ कंठावरुतेंमुखकमळ ॥ हनु
वटीअत्यंतसुनीळ ॥ मुखचंद्रमाअतिनिर्मळ ॥ भक्तस्नेहा
ळगोविंदा ॥ ६३ ॥ दोहींअधरामाजीदंतपंक्ती ॥ जिव्हा
जैसीलावण्यज्योती ॥ अधरामृतप्राशीचीगती ॥ तेंसुख
जाणेलक्ष्मी ॥ ६४ ॥ सरळसुंदरनासीक ॥ जेथेंपवनासीं 
झालेंसुख ॥ गंडस्थळींचेंतेजअधिक ॥ लखलखीतदोहीं

---

१ हात. २ ओंठाच्या आंत. ३ नाक.

भार्गी ॥ ६५ ॥ त्रिभुवनींचेंतेजएकवटलें ॥ बरवेपणासिगे
सिआलें ॥ दोहींपातयानेंधरिलें ॥ तेचनेत्रश्रीहरीचे ॥
॥ ६६ ॥ व्यंकटाभृकुटीयासुनीळा ॥ कर्ण[2]द्वयाचीअभिन
वलीळा ॥ कुंडलांच्याफांकतीकळा ॥ तोसुखसोहळाअ
लौलीक ॥ ६७ ॥ भाळ[3]विशाळसुरेख ॥ वरताशोभेकस्तू
रीटिळक ॥ केशकुरळअलोलिक ॥ मस्तकावरींशोभती ॥
॥ ६८ ॥ मस्तकींमुगुटआणिकिरिटी ॥ सभोंवताझिळमि
ळ्यांचीदाटी ॥ त्यावरीमयूर[4]पिच्छांचीवेटी ॥ ऐसानगजे
ठीदेखिला ॥ ६९ ॥ ऐसातूंदेवाधिदेव ॥ गुणातीतवासुदे

१ स्वर्ग, मृत्यु व पाताळ. २ कान. ३ कपाळ. ४ मोर.

ध्यं० व ॥ मांझियाभक्तिस्तव ॥ सगुणरूपझालासी ॥ ७० ॥ स्तो०
आतांकरूंतुझीपूजा ॥ जगज्जीवनाअधोक्षजा ॥ आर्षभा
॥ ८ ॥ वार्थहामाझा ॥ तुजअर्पणकेलाअसे ॥ ७१ ॥ करूनिपं
चामृतस्नान ॥ शुद्धामृतवरीघालुन ॥ तुजकरूंमंगळस्ना
न ॥ पुरुषसूक्तेंकरोनियां ॥ ७२ ॥ वस्त्रेंआणियज्ञोपवीत
तुजलागींकरूंप्रीत्यर्थ ॥ गंधाक्षतापुष्पेंबहुत ॥ तुजलागीं
समर्पूं ॥ ७३ ॥ धूपदीपनैवेद्य ॥ फलतांबूलदक्षिणाशुद्ध ॥
वस्त्रेंभूषणेंगोमेद ॥ पद्मरागादिकरूनी ॥ ७४ ॥ भक्तवत्स ॥ ८ ॥
लागोविंदा ॥ हीपूजाअंगीकरावीपरमानंदा ॥ नमस्का

---

१ साकार, मूर्तिमंत. २ जानवें. ३ विडा.

रुनिपादारविंदा ॥ मगप्रदक्षिणाआरंभिली ॥ ७५ ॥ ऐ
साषोडशोपचारेंभगवंत ॥ यथाविधिपूजिलाहृदयांत ॥
मगप्रार्थनाआरंभिलीबहुत ॥ वरप्रसादमागावया ॥
॥ ७६ ॥ जयजयाजीश्रुतिशास्त्रआम्नाया ॥ जयजयाजी
गुणातीतपरब्रह्मा ॥ जयजयाजीहृदयवासियारामा ॥ ज
गदोद्धाराजगद्गुरु ॥ ७७ ॥ जयजयाजीपंकजाक्षा ॥ जय
जयाजीकमलाधीशा ॥ जयजयाजीपूर्णपरेशा ॥ अव्य
क्तव्यक्तासुखमूर्ती ॥ ७८ ॥ जयजयाजीभक्तरक्षका ॥ ज
यजयाजीवैकुंठनायका ॥ जयजयाजीजगपाळका ॥ भ

---

१ वेद. २ गुणांवेगळी. ३ कमलनयना. ४ लक्ष्मीपती विष्णु.

 

क्तांसिसखातूंएक ॥ ७९ ॥ जयजयाजीनिरंजना ॥ जय
जयाजीपरात्परमहना ॥ जयजयाजीशून्यातीतनिर्गुणा ॥
 परिसावीविज्ञापनाएकमाझी ॥ ८० ॥ मजलादेईऐसावर
जेणेंघडेलपरोपकार ॥ हेंचिमागणेंसाचार ॥ वारंवार
प्रार्थितसे ॥ ८१ ॥ हाग्रंथजोपठणकरी ॥ त्यासींदुःखन
सावेंसंसारीं ॥ पठणमात्रेंचराचरीं ॥ विजयकरींजगातें ॥
॥ ८२ ॥ लक्ष्मार्थियासेंव्हावेंलक्ष ॥ धनार्थियासींव्हावेंधन
पुत्रार्थियाचेमनोरथपूर्ण ॥ पुत्रदेवोनिकरावे ॥ ८३ ॥ पु 
त्रविजयीआणिपंडित ॥ शतायुषीभाग्यवंत ॥ पितृसेवे

१ खरोखर. २ सृष्टिमध्यें.

सिअत्यंतरंत ॥ जयाचेंचित्तसर्वकाळ ॥ ८४ ॥ उदारआ णिसर्वज्ञ ॥ पुत्रदेईंभक्तांलागुन ॥ व्याधिष्ठाचीपीडाहरण तात्काळकीजेगोविंदा ॥८५॥ अक्षयअपस्मारकुष्ठादिरोग ग्रंथपठणेंसरावाभोग ॥ योगाभ्यासिखासियोग ॥ पठण मात्रेंसाधावा ॥ ८६ ॥ दरिद्रीव्हावाभाग्यवंत ॥ शत्रूंचा व्हावानिःपात ॥ सभावश्यसमस्त ॥ ग्रंथपठणेंकरोनि व्हावी ॥८७॥ विद्यार्थियाशिविद्याव्हावी ॥ युद्धींशस्त्रेंन लागावीं ॥ पठणेंजगांतकीर्तिव्हावी ॥ साधुसाधुम्हणोनि यां ॥ ८८ ॥ अंतींव्हावेंमोक्षसाधन ॥ ऐसेंप्रार्थनेसींदीजे

१ तत्पर, तयार. २ देहांतीं.

मन ॥ एवढेंमागतोंवरदान ॥ कृपानिधीगोविंदा ॥ ८९ ॥
प्रसन्नझालाव्यंकटरमण ॥ देविदासाशींदीधलेंवरदान ॥
 ग्रंथाक्षरींमाझेंकवन ॥ यथार्थजाणनिश्चयेसीं ॥ ९० ॥ ग्रं
थींधरोनिविश्वास ॥ पठणकरीलरात्रंदिवस ॥ त्यालागीं
मीजगदीश ॥ क्षणएकनविसंबें ॥ ९१ ॥ इच्छाधरूनिकरी
लपठण ॥ त्याचेंसांगतोंमीप्रमाण ॥ सर्वकामनेसीं[2]साधन
पठणएकमंडळ ॥ ९२ ॥ पुत्रार्थियानेंतीनमास ॥ धनार्थि
यानेंएकवीसदिवस ॥ कन्यार्थियानेंषण्मास ॥ ग्रंथआद 
रेंवाचावा ॥ ९३ ॥ क्षयअपस्मारकुष्ठादिरोग ॥ इत्यादि

---

१ दयारूपी सागर. २ इच्छा.

साधनेंप्रयोग ॥ त्यासींएकमंडळसांग ॥ पठणेंकरोनिका र्यसिद्धी ॥ १४ ॥ हेंवाक्यमाझेंनेमस्त ॥ ऐसेंबोलिलाश्री भगवंत ॥ साधनमानिज्याचेंचित्त ॥ त्यासींअधःपातसत्य होय ॥ १५ ॥ विश्वासधरीलग्रंथपठणीं ॥ त्यासींकृपाकरी लचक्रपाणी ॥ वरदीबळाअभयकरोनी ॥ अनुभवेंकळों येईल ॥ १६ ॥ गजेंद्राचियाआक्रांतासीं ॥ कैसापावला हृषीकेशी ॥ प्रल्हादाच्याभावार्थासीं ॥ खांबांतूनिप्रगट ला ॥ १७ ॥ व्रजासाठींगोविंदा ॥ गोवर्धनपरमानंदा ॥ उ चलूनियांस्वानंदकंदा ॥ सुखीकेलेंतयेवेळीं ॥ १८ ॥ वत्सां

---

१ खरें. २ गौळ्याकारितां. ३ बालक.

 

चेपरीभक्तांसीं ॥ मोहेंपान्हावेधेनुजैसी ॥ मातेच्यास्नेहतु
ळनेसी ॥ त्याचपरीघडलेंसे ॥ ९९ ॥ ऐसातूंमाझादातार
११॥ भक्तांसिघालीकृपेचीपाखंर ॥ हातयाचानिर्धार ॥ अना
थनाथनामतुझें ॥ १०० ॥ श्रीचैतन्यकृपाअलौलिक ॥
तोषऊनिवैकुंठनायक ॥ बरदीधलाअलौलिक ॥ जेणेंसुख
सकळांसी ॥ १०१ ॥ हाग्रंथलिहितांगोविंद ॥ यावचर्नीन
धरावाभेद ॥ हृदयींवसेपरमानंद ॥ अनुभवासिद्धसकळां
सीं ॥ २ ॥ याग्रंथींचाइतिहास ॥ भावेंबोलिलाविष्णुदास ॥११॥
आणीकनलागतीसायांस ॥ पठणमात्रेंकार्यसिद्धी ॥ ३ ॥

१ छाया. २ दुर्जेपणा. ३ यत्न.

पार्वतीसउपदेशीकैलासनायक ॥ पूर्णानंदप्रेमसुख ॥ त्या
चापारनजाणतीब्रह्मादिक ॥ मुनिसुरवरविस्मित ॥ ४ ॥
प्रत्यक्षप्रकटेलवनमाळी ॥ त्रैलोक्यभजतीत्रिकाळीं ॥
ध्यातीयोगीआणिचंद्रमौळी ॥ शेषाद्रीपर्वतींउभाअसे ॥
॥ ५ ॥ देविदासविनवीश्रोतयांचतुरां ॥ प्रार्थनाशतकप
ठणकरा ॥ जावयामोक्षाचियामंदिरा ॥ कांहींनलगती
सायास ॥ ६ ॥ एकाग्रचित्तींएकांतीं ॥ अनुष्ठानकीजेमध्य
रातीं ॥ बैसोनियांस्वस्थचित्तीं ॥ प्रत्यक्षमूर्तीप्रगटेल ॥
॥ ७ ॥ तेथेंदेहभावासीनुरेठाव ॥ अवघाचतुर्भुजदेव ॥

१ शंकर. २ देव. ३ यत्न.

 त्याचेचरणींठेऊनियांभाव ॥ वरप्रसादमागावा ॥ ८ ॥ इ 
तिश्रीदेवीदासविरचितं ॥ श्रीव्यंकटेशस्तोत्रंसंपूर्ण ॥ छ ॥
 ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ छ ॥ ओ०या ॥ १०८ ॥ ॥ छ ॥

हा ग्रंथ मुंबईत रा० रा० गोपाळ नारायण आणि
कंपनी मालक याजकरितां एशियाटीक
छापखान्यांत शिवराम गोविंद कुडा-
ळकर यांणीं छापून प्रसिद्ध केला.
मीति मार्गशीर्ष शुद्ध १ रविवार
शके १८०१ प्रमाथिनाम
संवत्सरे.
ता० २४ माहे दिजंबर सन १८७९ इसवी.

